**शासन जमा/जप्त झालेल्या अग्नीशस्त्राची किंमत ठरविण्यासाठी समितीचे गठन.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक-एएलएस १०९८/सी २८९/पोल-९,**
**गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक - ३१ ऑक्टोबर, २००१.**

**वाचा** - १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-एएलएस १०९३/सीआर ४१२/पोल-९, दिनांक २९ जानेवारी, १९९४
२) केंद्र शासनाच्या गृह विभागाचे पत्र क्रमांक-V ११०२०/७/९७ आर्म्स एनपीबी, दिनांक १६ ऑक्टोबर, २००१.

शासन जमा झालेल्या/ जप्त केलेल्या अग्नीशस्त्राची किंमत ठरविण्यासाठी संदर्भांकित दिनांक २९, जानेवारी १९९४ च्या शासन निर्णयाप्रमाणे जिल्हास्तरावर जिल्हादंडाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली आणि पोलीस आयुक्तालयाच्या ठिकाणी पोलीस आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली समिती कार्यरत आहे. मात्र केंद्र शासनाच्या संदर्भांकित दिनांक १६ ऑक्टोबर, २००१ च्या पत्रामधील परिच्छेद ३ (पाच) येथील निदेशानुसार अग्नीशस्त्राची किंमत ठरविण्यासाठी राज्य स्तरावर समिती गठन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे

**शासन निर्णय**

शासन जमा झालेल्या/जप्त केलेल्या अग्नीशस्त्रांची किंमत ठरविण्यासाठी शासन स्तरावर खालीलप्रमाणे मुल्य निर्धारण समिती गठीत करण्यात येत आहे -

| | | | |
|---|---|---|---|
| १) | प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग | - | अध्यक्ष |
| २) | सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग | - | सदस्य |
| ३) | संबंधित ठिकाणचे सह पोलीस आयुक्त /पोलीस उपायुक्त/ निवासी जिल्हादंडाकारी | - | सदस्य |
| ४) | मुंबई विभागातील दोन विश्वसनिय शस्त्र विक्रेते | - | सदस्य |
| ५) | उप सचिव (विशेष), गृह विभाग | - | सदस्य सचिव |

२. वरील मुल्य निर्धारण समिती अग्नीशस्त्राचे मुल्य निर्धारण करण्यासाठी १) अग्नीशस्त्राचे उत्पादन वर्ष २) जप्त केलेल्या अग्नीशस्त्राची सद्यस्थिती ३) अग्नीशस्त्राचे बाजारभावातील मुल्य ४) प्रस्तावित मुल्य आणी ५) त्याबाबतची कारणमिमांसा. इत्यादी बाबींचा समावेश असलेला

संबधित जिल्हादंडाधिकारी/पोलीस आयुक्त यांच्या स्तरावरील मुल्य निर्धारण समितीकडून अहवाल प्राप्त करुन घेईल.

३) वरील परिच्छेद दोन प्रमाणे अहवालावर राज्य स्तरावरील समिती चर्चा करुन सदरहू अहवाल पूर्णत: किंवा अंशत: मान्य करील अथवा नव्याने अग्नीशस्त्राचे मुल्य निर्धारण करील.

४) राज्यस्तरावरील बैठकीस दोन शस्त्र विक्रेत्यांपैकी किमान एका शस्त्र विक्रेत्याची उपस्थिती आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अं. शा. घार्गे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन , गृह विभाग.

प्रत,

अपर मुख्य सचिव (गृह), मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (विशेष), मंत्रालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व जिल्हा दंडाधिकारी,
सर्व पोलीस अधीक्षक.
उप सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती कार्यासन पोल-९,

H 1831-1 2-